**औरंगाबाद मध्यवर्ती कारागृहाकरीता निर्लेखित केलेल्या जुने शासकीय वाहनाच्या बदल्यात नवीन शासकीय वाहन खरेदीस व येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१३१४/प्र.क्र.१७२/तुरुंग-२**
जागतिक व्यापार केंद्र, सेंटर नं. १, ३० वा मजला,
कफ परेड, मुंबई-४०० ००५
दिनांक: २१ फेब्रुवारी, २०१५

वाचा

१) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. इ.प्र./वाहनखरेदी/औमका/५२०३/२०१४/कक्ष-६(२), दिनांक १.०५.२०१४.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र.वाहन २०१४/प्र.क्र.९/१४/विनियम, दिनांक ४.८.२०१४
३) शासन निर्णय गृह विभाग क्रमांकः जेएलएम-१३१२/प्र.क्र.८७/तुरुंग-२, दिनांक १५.२.२०१४

प्रस्तावना :-

अपर पोलीस महासंचालनालय व कारागृह महानिरीक्षणालय, पुणे आणि राज्यातील कारागृहांकडे एकूण ८६ शासकीय वाहनांची आवश्यकता लक्षात घेऊन राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेने वाहने अनुज्ञेय करण्यास उपरोक्त अनु. क्र.३ येथील दिनांक १५.२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून, सदर वाहनांमध्ये औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह या संस्थेकडील शासकीय वाहन ट्रक क्र. एमएच-२०-अे-२९२१ या सन १९९६ साली खरेदी करण्यात आलेल्या वाहनाचा समावेश असून सदर वाहन निर्लेखित करण्यात आलेले आहे. कारागृहातील उत्पादित पक्का माल, कच्चा माल, शेती उत्पादित माल, रेशन मधील धान्य वाहतूक यासाठी वाहन आवश्यक असल्याने औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह या संस्थेकडील जुने शासकीय वाहनाच्या बदल्यात वरील वाचा क्र.२ व ३ येथील शासन निर्णयाच्या अधीन नवीन शासकीय वाहन खरेदीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय

शासन आता, औरंगाबाद मध्यवर्ती कारागृहाकरीता टाटा एलपीटी ११०९ इएक्स -३६ बीएस III ट्रक हाय डेक एलबी या कंपनीचे/मॉडेलचे रु.८,९०,८४५/- ( आठ लक्ष नव्वद हजार आठशे पंचेचाळीस फक्त ) किंमतीचे (वाहनाची किंमत + विक्रीकर+ टेंपररी रजिस्ट्रेशन चार्जेस + मूल्यवर्धित कर इ. सह ) इतक्या किमतीच्या मर्यादेत खरेदीस मान्यता देण्यात येत आहे. सदर खरेदी विहीत कार्यपद्धतीनुसार करण्यात यावी.

२. याबाबतचा खर्च मागणी मागणी क्र. बी-५, २०५६-तुरुंग (योजनेतर), ००१, संचालन व प्रशासन, (००)(०१) कारागृह निरीक्षणालय (दत्तमत) (२०५६ ००२६), ५१, मोटर वाहने या उपशीर्षातंर्गत सन २०१४-१५ साठी उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारीक संदर्भ क्र. ५४५/१४/ विनियम, दिनांक १९.१०.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०२०७१३०४३२०४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jaysing L Pawara

Digitally signed by Jaysing L Pawara
DN: CN = Jaysing L Pawara, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.02.21 16:02:05 +05'30'

(ज.ल.पावरा)
शासनाचे उप सचिव

प्रत,

- अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
- महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य १ मुंबई,
- महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य १ मुंबई,
- कारागृह उपमहानिरीक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद,
- अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, औरंगाबाद,
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
- कक्ष अधिकारी (विनियम), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२,
- उप सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,
- निवड नस्ती (तुरुंग-२).